**जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार, जिल्हा पालघर कार्यालयातील कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती वेतन व निवृत्ती वेतन उपदान योजना लागू करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**दिव्यांग कल्याण विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: दिव्यांग-२०२३/प्र. क्र. ०८/दि. क. ०४,**
तिसरा मजला, अे-विंग, मित्तल टॉवर,
नरिमन पॉईंट, मंत्रालय, मुंबई-४०० ०२१
दिनांक:- ०५ मार्च, २०२४.

**वाचा:-** १) समाज कल्याण मंत्रालय, भारत सरकारचे अ. शा. पत्र क्रमांक १५-१/बी-४-एचडब्ल्यु-III, दिनांक ११.२.१९८५.

२) केंद्र शासन, सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली यांचे पत्र क्रमांक डीआरसी/एसीसीटीएस/स्टेट डीआरसीज/२००४, दिनांक २२.१२.२००५.

३) शासन निर्णय सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग क्रमांक: अपंग-२००६/प्र. क्र.४ / सुधार-३, दिनांक १२ जुलै, २००७.

४) आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक आस्था/जिअपुकेविरार /भनिनि/२०१०/३५९४, दिनांक २७ सप्टेंबर, २०१०.

५) आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे यांचे पत्र क्रमांक आस्था/मॅट/आदेश/ जिदुपुकें/ विरार/२०२२-२३/१९७९/पुणे, दिनांक १/९/२०२२.

६) मा. मुख्य सचिव, यांचेकडे दिनांक १९.१२.२०२२ रोजी झालेल्या बैठकीचे इतिवृत्त.

७) दिनांक १०.०१.२०२४ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीतील निर्णय.

**प्रस्तावना:-**

जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार हे केंद्र शासनाच्या ग्रामीण पुनर्वसन प्रकल्प या योजनेअंतर्गत अखिल भारतीय भौतिक चिकित्सा व पुनर्वसन केंद्र, मुंबई यांचेमार्फत प्राथमिक आरोग्य केंद्र, विरार, जि. ठाणे येथे सन १९८३ मध्ये सुरु करण्यात आले होते. सदर केंद्राची उपयुक्तता विचारात घेऊन केंद्र शासनाने डिस्ट्रीक्ट रिहॅबिलिटेशन सेंटर ही योजना १९८५ मध्ये सुरु केली होती. या योजनेअंतर्गत कृत्रिम अवयवांचा पुरवठा करण्यासाठी जिल्हा दिव्यांग पुर्नवसन केंद्र, विरार या संस्थेचे कार्यक्षेत्र संपूर्ण राज्यासाठी करण्यात आले. सदरचा कार्यक्रम हा प्रायोगिक तत्वावरील असल्याने या योजनेसाठी १००% निधी केंद्र शासनाकडून उपलब्ध करुन देण्यात येत होता. दिव्यांग पुनर्वसन केंद्रामधून दिव्यांगांना अनेक सुविधांचे लाभ मिळाले आहेत. प्रकल्प कालावधी पूर्ण झाल्यानंतर सदर कार्यक्रम संबंधित राज्य शासनाकडे हस्तांतरीत करण्यात येणार असल्याने या कार्यक्रमांतर्गत नियुक्त करण्यात आलेल्या कर्मचाऱ्यांना पेन्शन, भविष्य निर्वाह निधी, ग्रॅच्युटी सारखे वेतनश्रेणी, भत्ते, सेवाशर्ती इत्यादी या केंद्रातील कर्मचाऱ्यांना राज्य शासनाप्रमाणे लागू राहतील व त्यानुसार योग्य ती कार्यवाही करण्याच्या सूचना केंद्र शासनाच्या दिनांक १८.०८.१९८७ च्या पत्रान्वये देण्यात आल्या होत्या.

केंद्र शासनाच्या दिनांक २२.१२.२००५ च्या पत्रान्वये डिस्ट्रीक्ट रिहॅबिलिटेशन सेंटर, ही योजना दिनांक १ एप्रिल, २००६ पासून बंद करण्याचे ठरविले असून या योजनेसाठी केंद्र शासनाकडून कोणतीही आर्थिक तरतूद केलेली नाही. तसेच जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार राज्य शासनाने ताब्यात घ्यावे अथवा दिनांक ३१.३.२००६ पूर्वी केंद्र बंद करण्याची कार्यवाही करावे असे कळविले होते.

जिल्हा दिव्यांग पुर्नवसन केंद्र, विरार या केंद्राची उपयुक्तता विचारात घेऊन, दिनांक १२ जुलै, २००७ च्या शासन निर्णयानुसार दिनांक १ एप्रिल २००६ पासून जिल्हा पुनर्वसन केंद्र कर्मचाऱ्यांसह ताब्यात घेण्यात आले आहे. जिल्हा पुनर्वसन केंद्र ताब्यात घेण्यात आल्यानंतर कर्मचारी, कर्मचाऱ्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९९८ प्रमाणे करण्यात येऊन या कर्मचाऱ्यांना राज्य शासनाच्या कर्मचाऱ्यांप्रमाणे सर्व सेवा/शर्ती लागू करण्यात येऊन सेवाविषयक लाभ देण्यात आले आहेत.

जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्रातील अधिकारी / कर्मचाऱ्यांची निवड १९८३-१९९० या कालावधीत केंद्र शासनामार्फत करण्यात आली असून त्यांचे मानधन / वेतन केंद्र शासनातर्फे देण्यात येत होते. त्यांचे वेतन राज्य शासनाच्या निधीमधून होत नसल्याने त्यांना भविष्य निर्वाह निधी क्रमांक प्राप्त झाला नाही. केंद्र शासनाच्या दिनांक २९.३.२००० च्या पत्रानुसार कर्मचाऱ्यांना पूर्वलक्षी प्रभावाने सी.पी.एफ. योजना लागू करुन सी.पी.एफ. ची कर्मचारी व शासनाची वर्गणी जमा करण्यात आली परंतु, सी.पी.एफ. क्रमांक प्राप्त न झाल्याने जुलै, २००६ पर्यतची जमा करण्यात आलेली वर्गणी स्टेट बँकेच्या, विरार शाखेत जमा करण्यात आली आहे.

पुनर्वसन केंद्रातील कर्मचाऱ्यांच्या नियुक्त्या १९८३-८४ पासून झालेल्या आहेत, परंतु त्यांना निवृत्तीवेतन विषयक कोणतीही योजना लागू झाली नसल्याने कर्मचाऱ्यांनी केंद्रीय प्रशासकीय न्यायाधिकरण, उच्च न्यायालय तसेच सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल केलेल्या याचिका प्रकरणी दिलेल्या निर्णयानुसार कर्मचाऱ्यांच्या सेवा चालू ठेवण्यात आल्या आहेत. दिव्यांग पुर्नवसन केंद्रातील कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्ती वेतन विषयक लाभ मिळण्यासाठी महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई येथे दाखल केलेल्या मूळ अर्ज क्रमांक ४९८/२०१५ प्रकरणी सहा महिन्यात निर्णय घेण्याचे आदेश मा. न्यायाधिकरणाने दिले आहेत. सदर कर्मचाऱ्यांची दिव्यांग कल्याण क्षेत्रात झालेली प्रदीर्घ सेवा पाहता, त्यांना मिळणाऱ्या निवृत्तीपश्चात देय लाभापासून वंचित ठेवणे उचित होणार नसल्याने पुनर्वसन केंद्रातील कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ नुसार अनुज्ञेय असलेली सेवानिवृत्ती व उपदान योजना, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सर्वसाधारण भविष्यनिर्वाह योजना या नियमातील सर्व तरतूदीसह तसेच त्यामध्ये वेळोवेळी झालेल्या सुधारणांसह लाभ मंजूर करण्याविषयी धोरणात्मक निर्णय घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार, जि. पालघर येथे दिनांक ०१.११.२००५ पूर्वी कार्यरत असलेल्या आणि दिनांक १२.०७.२००७ च्या शासन निर्णयानुसार राज्य शासनाच्या ताब्यात घेतलेल्या पुनर्वसन केंद्रातील एकूण २४ कर्मचाऱ्यांपैकी १ राजीनामा दिलेला कर्मचारी वगळता इतर

२३ कर्मचाऱ्यांना महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ नुसार अनुज्ञेय असलेली सेवानिवृत्ती व उपदान योजना, महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन अंशराशीकरण) नियम १९८४ आणि सर्वसाधारण भविष्यनिर्वाह योजना या नियमातील सर्व तरतूदीसह तसेच त्यामध्ये वेळोवेळी झालेल्या सुधारणांसह लागू करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. सदर योजना लागू करताना पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आले आहे:-

I. दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार या संस्थेमध्ये दिनांक ०१.११.२००५ पूर्वी नियुक्त झालेल्या कर्मचाऱ्यांना त्यांच्या मूळ नियुक्तीच्या दिनांकापासून महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम १९८२ व महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन अंशराशीकरण) नियम १९८४ लागू करण्यात यावेत.

II. जिल्हा दिव्यांग पुनर्वसन केंद्र, विरार येथील कर्मचाऱ्यांना जुनी निवृत्तीवेतन योजना लागू केल्यास, कर्मचाऱ्यांकडून CPF ची जमा केलेली रक्कम संबंधित कर्मचाऱ्यांना जमा झालेल्या व्याजासह अदा करण्यात येईल. तसेच केंद्र शासनाकडून भरणा करण्यात आलेली CPF ची रक्कम व्याजाच्या रक्कमेसह राज्य शासन खाती जमा करण्यात यावी.

III. शासनाकडून देय असलेली सेवानिवृत्ती नि-उपदानाची रक्कम तसेच निवृत्तीवेतनाची रक्कम तीन हप्त्यामध्ये सेवानिवृत्त कर्मचाऱ्यांना अदा करण्यात यावी.

IV. जिल्हा पुनर्वसन केंद्रातील कर्मचाऱ्यांना सेवा उपदानाची ( Graduaty ) रक्कम केंद्र राज्य शासनाने ताब्यात घेण्यात आलेल्या दिनांक १.४.२००६ पासून अदा करण्यात यावी.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२४०३०५१६५०१९९२३५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ADHIKRAO BAPU BUDHE

Digitally signed by ADHIKRAO BAPU BUDHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PERSONS WITH DISABILITIES WELFARE DEPARTMENT,
2.5.4.20=e9b3afc989167fcd7f4487809755a2a08c37958a70b01ce9dd6139bffb1e6896, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=6DD8309934E3A186F9E32AB2ED268A322FA2805ECBD838D076066AA8F4668BC0, cn=ADHIKRAO BAPU BUDHE
Date: 2024.03.05 16:59:57 +05'30'

**( अधिकराव बा. बुधे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई
मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
आयुक्त, दिव्यांग कल्याण आयुक्तालय, पुणे
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरिक्षा) महाराष्ट्र राज्य १/२ मुंबई/ नागपूर
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
जिल्हा कोषागार अधिकारी, पालघर/ठाणे

जिल्हा समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद, पालघर/ठाणे.
जिल्हा पुनर्वसन अधिकारी, पुनर्वसन केंद्र, विरार, जि.पालघर
वित्त विभाग (व्यय-१४), मंत्रालय, मुंबई
कक्ष अधिकारी, दिव्यांग कल्याण विभाग (दि. क. २), मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती दि.क.४